**आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय यांच्यासाठी निर्माण केलेल्या पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०२५/प्र.क्र. ४५/आव्यप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००0३२.
दिनांक: १८ मार्च, २०२५

वाचा:-
१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१६/प्र.क्र.७४/आव्यप्र-१, दि. ३०.०९.२०२४
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०३ मार्च २०२५.

प्रस्तावना:-

नैसर्गिक आपत्तीमुळे उद्भवणाऱ्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी स्वतंत्र यंत्रणा स्थापित करावी. सदर यंत्रणा राज्यातील संभाव्य आपत्तीचा अंदाज करून त्यांची संभाव्य ठिकाणे निवडून त्या ठिकाणी आपत्तीपासून बचाव करणारी यंत्रणा उभी करणे, विद्यार्थी व ग्रामस्थांना प्रशिक्षण देणे आणि आपत्ती उद्भ्वल्यास त्वरीत प्रतिसाद देणारी यंत्रणा उभी करावी या दृष्टीने केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने मुख्य सचिव यांच्यास्तरावर वेगळी यंत्रणा कार्यान्वित करण्याची शिफारस केली होती. केंद्र शासनाच्या या सूचनेस अनुसरून मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली केंद्रीय अंमलबजावणी गटाची बैठक होऊन महसूल व वन विभागाच्या नियंत्रणाखाली आपत्कालीन व्यवस्थापन प्रभागाची निर्मिती करण्यात आली. या प्रभागात ४१ पदे मंजूर होती.

संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दि. ०१ सप्टेंबर, २०२४ ते दि. २८ फेब्रुवारी, २०२५ या कालावधीत सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भादिन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च २०२५ ते ३१ ऑगस्ट २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान केले आहेत. त्यानुसार सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आपत्ती व्यवस्थापन प्रभागातील सोबतच्या विवरणपत्र अ येथे दर्शविण्यात आलेल्या ४१ पदांना दिनांक ०१ मार्च २०२५ ते ३१ ऑगस्ट २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. मुदतवाढ देण्यात आलेल्या विवरणपत्र-अ मधील पदांचे वेतन व भत्त्यावरील खर्च मागणी क्र. सी-४, प्रधानशीर्ष, २०५२- सचिवालय सर्वसाधारण सेवा (००) (०८) आपत्कालीन व्यवस्थापन कक्ष (अनिवार्य) (२०५२- ०६०६) ०१ - वेतन, या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०३ मार्च २०२५ रोजीच्या शासन निर्णयानुसार विभाग प्रमुखांना प्रत्यायोजित केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१८१२३४४९४६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDEEP KAMBLE

Digitally signed by SANDEEP KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=Revenue and Forest Department,
2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99
bcaf818e1f49cebd842804, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=ba1e056ad55b2f343783a4c13760c8eef1236
df77ebd34a5cc6127a29f1650b1, cn=SANDEEP KAMBLE
Date: 2025.03.18 12:36:14 +05'30'

**( संदीप कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
२) महालेखापाल, लेखा परिक्षा, १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई.
६) उप सचिव (ई शाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) वित्तीय सल्लागार तथा सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन , मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग (आव्यप्र-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी, ई शाखा/ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) वित्त विभाग, वित्तीय सुधारणा-२, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती. आव्यप्र-१.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्र. आव्यप्र-२०२५/प्र.क्र. ४५/ आव्यप्र-१,**
**दि. १८ मार्च, २०२५ चे विवरण पत्र - अ**

महसूल व वन विभाग , शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२५/प्र.क्र. ४५/ आव्यप्र-१, दि. १८ मार्च २०२५ अन्वये आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, महसूल व वन विभागासाठी खालील नमूद केलेल्या ४१ पदांना दि. १ मार्च , २०२५ ते ३१ ऑगस्ट २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे:-

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | वित्तीय सल्लागार व सह सचिव | १ |
| २ | संचालक व पदसिध्द सह सचिव | १ |
| ३ | अवर सचिव / विशेष कार्य अधिकारी | २ |
| ४ | अवर सचिव (वित्त व लेखा वर्ग-१ ) | १ |
| ५ | कक्ष अधिकारी | ३ |
| ६ | लेखा अधिकारी (२-वर्ग) | १ |
| ७ | सहायक कक्ष अधिकारी | ९ |
| ८ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १ |
| ९ | सहाय्यक लेखा अधिकारी | १ |
| १० | उप लेखापाल | १ |
| ११ | रोखपाल | १ |
| १२ | लघुटंकलेखक | ४ |
| १३ | लिपीक-टंकलेखक | ९ |
| १४ | वाहनचालक | ३ |
| १५ | शिपाई | ३ |
| | **एकुण** | **४१** |

SANDEEP KAMBLE

Digitally signed by SANDEEP KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99bcaf818e1f49cebd842804, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ba1e056ad55b2f343783a4c13760c8eef1236df77ebd34a5cc6127a29f1650b1, cn=SANDEEP KAMBLE
Date: 2025.03.18 12:36:49 +05'30'

**(संदीप कांबळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**